**राज्य योजना सन २०१५-१६**
संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरीता संरक्षण भिंत बांधणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१५/प्र.क्र.२२०/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०७ जुलै, २०१५.

वाचा :-

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.५९ (१५-१६)/५०७, दिनांक २३.०६.२०१५.
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनेतंर्गत योजनेअंतर्गत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरिता संरक्षण भिंत बांधणे (२४०६ २२०३) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु. ७०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सबब, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी रू. १०० लक्षचा प्रस्ताव सादर केलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रक क्रमांक २ अन्वये सन २०१५-१६ करीता योजनेअंतर्गत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरिता संरक्षण भिंत बांधणे (२४०६ २२०३) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधी माहे नोव्हेंबर, २०१५ पर्यत खर्च करण्यास " **अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही** " या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून रुपये ४९.०० लक्ष निधी खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, उपशीर्ष ०२ पर्यावरणीय वनीकरण, व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन, (००) (०७) संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरिता संरक्षण भिंत बांधणे बाबत (राज्य) (२४०६ २२०३) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने

वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

५. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविधी मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक १७.०४.२०१५ च्या परीपरीपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१२३६०९५०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.07.07 12:38:42 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई,
५. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१५/प्र.क्र.२२०/फ-१, दिनांक ०७ जुलै, २०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.**

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-२२०३ | अर्थसंकल्पित निधी | जलै, २०१५ | ऑगस्ट, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ५३-मोठी बांधकामे | १००.०० | २५.०० | २४.०० | ४९.०० |

****